सरदार सरोवर प्रकल्पांतर्गत मत्स्यविकास व मत्स्यसंवर्धनाच्या मंजूर कृति आराखडयास लागणाऱ्या वाढीव खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्र.मत्स्यआ-२०११/प्र.क्र.२१४/११/पदुम-१३,
मंत्रालय,मुंबई-४०००३२.
दिनांक :-१२ सप्टेंबर,२०१४.

वाचा:-

१) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग क्र.मत्स्यवि-२४११/प्र.क्र.२१४/११/पदुम-१३, दिनांक १८ मार्च,२०१३.
२) आयुक्त मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र मत्स्य/भू/०२१६०१/९२/२०१२, दि.२७/५/२०१४, दि.१८.७.२०१४, दि.११.८.२०१४, दि.२५.८.२०१४, दि.३.९.२०१४.

प्रस्तावना:-

सरदार सरोवर प्रकल्पांतर्गत मत्स्यविकास व मत्स्यसंवर्धनासाठी सन २०११-१२ व २०१२-१३ या वर्षाच्या कृती आराखडयास व त्यासाठी लागणा-या रु. ७२.५५ लक्ष खर्चास दिनांक १८.३.२०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. मात्र त्यासाठी मार्च २०१४ अखेर पर्यंत नर्मदा नियंत्रण प्राधिकरणाकडून निधी प्राप्त न झाल्यामुळे प्रकल्पाच्या कामास प्रत्यक्षात सुरवात झालेली नाही. पर्यावरण विभाग, मंत्रालय मुंबई येथे दिनांक ६.३.२०१४ व दिनांक २६.३.२०१४ रोजी झालेल्या आढावा बैठकीच्या अनुषंगाने दिलेल्या सूचनेनुसार आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी वेळोवेळी वाढलेले दरपत्रक विचारात घेवून तयार केलेल्या सुधारित कृती आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यासाठी प्रस्ताव शासनास सादर केलेले आहेत. त्याप्रमाणे प्रस्ताव पर्यावरण विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आले असता, पर्यावरण विभागाने नर्मदा नियंत्रण प्राधिकरण मंजूर कृती आराखडयाप्रमाणे कार्यवाही करावी व मंजूर कृती आराखडयाच्या खर्चामध्ये बदल झाल्याबाबत नर्मदा नियंत्रण प्राधिकरणास मत्स्यव्यवसाय विभागाने अवगत करावे, त्यास पर्यावरण विभागाच्या स्वतंत्र मान्यतेची आवश्यकता नाही. सदर कार्यवाहीस काही कालावधी लागणार असल्याने मान्य कृती आराखडयतील कामे चालू आर्थिक वर्षात मान्य किंमतीपर्यंत हाती घेण्याबाबतही मत्स्यव्यवसाय विभाग निर्णय घेऊ शकतो असे अभिप्राय दिले आहे. आयुक्त मत्स्यव्यवसाय यांच्याकडील प्राप्त सुधारित कृती आराखडयामधील माहितीमध्ये प्रत्येक वेळी वाढीव खर्चाची वेगवेगळी आकडेवारी सादर झालेली आहे.

सदर प्रकल्पास मान्यता मिळून १ वर्षाचा कालावधी झालेला असून अद्याप पर्यंत प्रकल्पाच्या कामास सुरवात झालेली नाही. तसेच संचालक (पर्यावरण), नर्मदा नियंत्रण प्राधिकरण यांनी दिनांक १२.५.२०१४ च्या पत्रान्वये मान्यताप्राप्त कृती आराखडा सादर करणेबाबत व दिनांक १३.६.२०१४ रोजी मत्स्य बोटुकली संचयनासाठी रु.३३ लाख निधी प्रस्तावित करण्याबाबत कळविले आहे. त्याचप्रमाणे

मंजूर कृती आराखडयाप्रमाणे प्रकल्पग्रस्तांच्या चार मच्छिमार संस्था स्थापन झाल्या असून त्यांच्या उपजिविकेसाठी तयार केलेला कृती आराखडा मत्स्य बोटुकली संचयन केल्याशिवाय राबविता येणार नाही. त्यासह रु.८७.०५ लक्ष च्या वाढीव खर्चाच्या सुधारित कृती आराखडयास मान्यता देण्याबाबत आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी प्रस्तावित केले आहे.

उक्त सर्व बाबी विचारात घेता सदर प्रकल्प सुरु होण्यास विलंब होवू नये यासाठी वाढीव खर्चाची बाब प्रत्यक्ष आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी फेर तपासणी करण्याच्या आणि नर्मदा नियंत्रण प्राधिकरणाच्या मान्यतेच्या अधिन राहून नव्याने बोटुकली संचयनासाठी रु.३३ लक्ष च्या खर्चासह सदर प्रकल्पाच्या वाढीव एकूण रु. ८७.०५ लक्ष इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

सरदार सरोवर प्रकल्पांतर्गत मत्स्यविकास व मत्स्यसंवर्धनासाठी सन २०११-१२ व २०१२-१३ या वर्षाच्या कृती आराखडयास व त्यासाठी लागणा-या रु. ७२.५५ लक्ष खर्चास शासनाच्या दिनांक १८.३.२०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. यामध्ये मेजर कार्प फिशींग स्टॉकिंगचा नव्याने समावेश करण्यास व त्यासाठी लागणाऱ्या रु.३३ लक्ष खर्चास मान्यता देण्यात येत आहे. तसेच, या खर्चासह सदर प्रकल्पासाठी लागणाऱ्या रु.८७.०५ लक्ष (अक्षरी रुपये सत्याऐंशी लक्ष पाच हजार फक्त) एवढया वाढीव रकमेच्या खर्चास सन २०१४-१५ मध्ये राबविण्यास प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्यात येत आहे. अशा प्रकारे एकूण रु.१५९.६० लक्ष (अक्षरी एकशे एकोणसाठ लक्ष साठ हजार फक्त) च्या खर्चास मंजूरी देण्यात येत आहे. याबाबतचे विवरणपत्र -अ सोबत जोडले आहे.

२. सदर प्रशासकीय मंजुरी खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यापूर्वी नर्मदा नियंत्रण प्राधिकरणाची मान्यता घेण्यात यावी.

२) सदर प्रकल्पाच्या वाढीव खर्चाबाबत आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी फेरतपासणीची दक्षता घ्यावी.

३) सदर प्रकल्पासाठी लागणाऱ्या साहित्यांची खरेदी शासन ध्येयधोरणानुसार व शासन दरपत्रकानुसार करण्याची दक्षता घ्यावी.

४) खरेदीबाबतच्या लेख्यांची माहिती सक्षम प्राधिकाऱ्याकडे सादर करणे बंधनकारक राहील.

५) उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

३. तसेच दिनांक १८.३.२०१३ च्या शासन निर्णयामधील अटी व शर्ती कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१४०९१२१४५१४४८५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shashank Madhav Sathe

Digitally signed by Shashank Madhav Sathe
DN: CN = Shashank Madhav Sathe, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.13 17:47:30 +05'30'

(श.मा.साठे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
२) प्रधान सचिव , नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
३) सचिव , पर्यावरण विभाग,मंत्रालय,मुंबई
४) सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
५) संचालक, नर्मदा नियंत्रण प्राधिकरण, नर्मदा सदन, ब्लॉक-डी, स्कीम नं. ७४, विजयनगर,इंदोर. ४५२०१० (मध्यप्रदेश)
६) आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
७) जिल्हाधिकारी, नंदूरबार.
८) प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय,नाशिक
९) सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, नंदूरबार.
१०) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३) सर्व कोषागार अधिकारी
१४) निवड नस्ती.

शासन निर्णय क्र.मत्स्यआ-२०११/प्र.क्र.२१४/११/पदुम-१३, दि.१२ सप्टेंबर, २०१४ सोबतचे

## विवरणपत्र -अ

| अ.क्र. | बाब / योजना | भौतिक उद्दिष्ट (लाखात घटक) | | | आर्थिक उद्दिष्ट (रुपये लाखात) | | | सन २०१४-१५ च्या भावानुसार लागणारी आवश्यक तरतूद | अतिरिक्त तरतूद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | सन २०११-१२ | सन २०१२-१३ | एकूण | सन २०११-१२ | सन २०१२-१३ | एकूण | | |
| १. | दुर्मिळ मत्स्यबोटुकली संचयन | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- |
| | अ)म्हाशीर (टॉरटॉर) | ०.१० | ०.६० | ०.७० | ०.१५ | ०.५० | ०.६५ | ०.७० | ०.०५ |
| | ब)रिटारिट | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | -- | -- |
| | क)लॅबीयो फिंब्री एटस् | ०.०० | ०.६० | ०.६० | ०.०० | ०.८६ | ०.८६ | ०.८६ | -- |
| | ख)नोटापटेरेस चिताळा | ०.०० | ०.६० | ०.६० | ०.०० | ७.७० | ७.७० | ७.७० | -- |
| १ अ | मेजर कार्प फिंगरलिंग स्टॉकींग | -- | -- | -- | -- | -- | -- | ३३.०० | ३३.०० |
| २. | मासेमारी साधनांच्या खरेदीवर १०० टक्के अनुदान (प्रकल्पग्रस्तांसाठी) | | | | | | | | |
| | अ)नायलॉन जाळे अनुदान | ०.०० | १५०० किलो | १५०० किलो | ०.०० | ९.०० | ९.०० | ११.२५ | २.२५ |
| | ब)यंत्रविरहित फायबर नौका | ०.०० | ४० नग | ४० नग | ०.०० | ८.०० | ८.०० | २०.०० | १२.०० |
| | क)यांत्रिकी फायबर नौका | ० | ५ नग | ५ नग | ० | ११.२५ | ११.२५ | २१.०० | ९.७५ |
| | ड)मत्स्य जतन शीतपेटी | ० | २०० नग | २०० नग | ० | ४.०० | ४.०० | ८.०० | ४.०० |
| | इ)शीतपेटीयुक्त मीनी टेंपो | ० | ४ नग | ४ नग | ० | १२ | १२ | ३८.०० | २६.०० |
| ३. | मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थांना ना परतावा भाग भांडवल देणे (प्रकल्पग्रस्तांसाठी | ० | ४ | ४ | ० | २.०० | २.०० | २.०० | -- |
| ४. | मच्छीमारांना प्रशीक्षण (प्रकल्पग्रस्तांसाठी) | १५० | १५० | ३०० | १.५० | १.५० | ३.०० | ३.०० | -- |
| ५. | आयडीफिकेशन व मोबीलायझेशन (Identification & mobilization) (प्रकल्पग्रस्तांचे) | -- | -- | -- | १.०० | ४.०० | ५.०० | ५.०० | -- |
| ६. | योजनेचे नियंत्रण | -- | -- | -- | १.०० | ४.०० | ५.०० | ५.०० | -- |
| ७. | सल्ल्यासाठी CIFRI देय फी | -- | -- | -- | ४.०९ | -- | ४.०९ | ४.०९ | -- |
| | एकूण | | | | ७.७४ | ६४.८१ | ७२.५५ | १५९.६० | ८७.०५ |